बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारक प्रकल्पाच्या उभारणासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी नविन लेखाशिर्ष उघडण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२१/प्र.क्र.२६/नवि-७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०६ जानेवारी, २०२२

**प्रस्तावना:-**

स्वर्गीय बाळासाहेब ठाकरे यांच्या स्मृती जपण्यासाठी मुंबईतील शिवाजी पार्क, दादर येथील महापौर निवास स्थानाच्या जागेवर बाळासाहेब ठाकरे यांच्या राष्ट्रीय स्मारकाची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत उभारणी करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सदर प्रकल्पाच्या उभारणीवर होणारा खर्च सुरुवातीस मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण स्वनिधीतून करणार असून प्राधिकरणाने केलेल्या अशा खर्चाची प्रतिपुर्ती राज्यशासनाकडून करण्यात येणार आहे. प्राधिकरणाने केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबईतील शिवाजी पार्क, दादर येथील महापौर निवास स्थानाच्या जागेवर बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारक प्रकल्पाच्या उभारणासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून केलेल्या खर्चाची राज्य शासनामार्फत प्रतिपूर्ती करण्यासाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे:-

| मागणी क्र. एफ-२ (Demand No. F-2) | | | |
|---|---|---|---|
| 2217 | Urban Development | २२१७ | नगरविकास विभाग |
| 80 | General | ८० | सर्वसाधारण |
| 191 | Assistance to Municipal Corporations | १९१ | महानगरपालिकांना सहाय्य |
| (00)(92) | Grant-in-aid to Mumbai Metropolitan Region Development Authority for construction of Balasaheb Thackeray Rashtriya Smarak<br>CRC (2217A412)<br>31, Grant-in-aid (Non-Salary) (Scheme) Voted | (००)(९२) | बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारकाच्या बांधकामासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला सहाय्यक अनुदान<br>सांकेतांक (२२१७A४१२)<br>३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (कार्यक्रम) / दत्तमत |

०२. उक्त नमूद नवीन लेखाशिर्ष २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून अंमलात येईल.

**०३.** सदरचा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच महालेखाकार कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सं.ख.वि./चा-१ नगर विकास विभाग/यूओआर-१०२/२०२१-२२/५३८, दिनांक २१/१२/२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०१०६११३१०२५३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, pseudonym=313EF6135E0B8753370AABCB2544201CB95641CD, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2022.01.06 15:01:39 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, महाराष्ट्र-२, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
११. सर्व सह सचिव/उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प-१६/ऋण व हमी/अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी, नवि-४/५/३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. लेखा अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती, नवि-७.